बेवारटोला लघु पाटबंधारे योजना ता. सालेकसा जि. गोंदिया, या योजनेस द्वितीय सुधारित प्रशासकिय मान्यता प्रदान करणेबाबत.

महाराष्ट्र शासन
जलसंपदा विभाग
शासन निर्णय क्रमांकः प्रकल्प २३१२( २७४/२०१२)/लपा-२
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
तारीख: ५ फेब्रूवारी, २०१५

पहावे

१) कार्यकारी संचालक, विदर्भ पाटबंधारे विकास महामंडळ यांचे पत्र क्र. ५६५८/कातां.१(२)/(५३/१२)/बेवारटोला-द्वितीय सुप्रमा/२०१२ दि. १२.०६.२०१२
२) वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई-३२ यांचे पत्र क्रमांक व्ययस-२०१४/प्रक्र१९९/अर्थ-२ दिनांक १ जानेवारी, २०१५.

प्रस्तावना

शासन निर्णय क्रमांक लपायो २३०२/(४४६/०२)/लपा-२ दिनांक २०.०४.२००४ अन्वये एकूण अंदाजित खर्च रु. २७२७.१३ लक्षच्या किंमतीस प्रशासकीय मान्यता प्रदान करण्यात आली होती. हा प्रशासकीय मान्यतेचा प्रस्ताव तयार करतांना सन २०००-२००१ च्या दरसूचीप्रमाणे दर वापरण्यात आले होते. मध्यंतरीच्या काळात योजनेच्या खर्चात दरसूचीतील फरकामुळे, जास्त दराची निविदा स्वीकृती, भूसंपादन किंमतीतील झालेली वाढ, संकल्पचित्रातील बदल इत्यादी कारणांमुळे वाढ होत असल्यामुळे योजनेस सुधारित प्रशासकीय मान्यता प्रदान करणे आवश्यक झाले आहे.

शासन निर्णय

आता या निर्णयान्वये ल.पा. योजना बेवारटोला ता. सालेकसा, जि. गोंदिया, या योजनेचा एकूण अंदाजीत खर्च रुपये ६९७५.९३ लक्ष (रु. एकोणसत्तर कोटी, पंचहत्तर लक्ष, त्र्याणव हजार, फक्त) या किंमतीस सुधारीत प्रशासकीय मान्यता प्रदान करण्यात येत आहे. कामासाठीची एकूण तरतूद रूपये ६३८७.३४ लक्ष (रू. त्रेसष्ट कोटी, सत्याऐंशी लक्ष, चौतीस हजार फक्त) व अनुषंगीक खर्चासाठीची एकूण तरतूद रूपये ५८८.५९ लक्ष (रू. पाच कोटी, अठ्ठयाऐंशी लक्ष, एकोणसाठ हजार फक्त) आहे. अंदाजपत्रकात उर्वरित कामासाठी सन २००७-२००८ या वर्षाच्या दरसूचीप्रमाणे दर वापरण्यात आले आहेत. उपशिर्षवार तरतुदींचा गोषवारा सोबत परिशिष्टामध्ये जोडला आहे.

व्यय अग्रक्रम समितीच्या दिनांक २१ ऑगस्ट, २०१४ रोजी झालेल्या बैठकीच्या इतिवृत्तात नमुद केल्यानुसार “जून, २०१५ पर्यंत काम पूर्ण करावे.” या अटीच्या अधीन राहून सुधारित प्रशासकीय मान्यतेचा निर्णय निर्गमीत करण्यात येत आहे.

या योजनेच्या कामावरील खर्च मागणी क्र. आय-५,"४७०२ लहान पाटबंधारे यावरील भांडवली खर्च ८०-सर्वसाधारण १९०, सार्वजनिक क्षेत्रातील व इतर उपक्रमातील गुंतवणूका (००) (०५) विदर्भ पाटबंधारे विकास महामंडळाला भाग भांडवली अंशदान (४७०२ ५१०१)" या लेखाशिर्षाखाली खर्ची घालावा व शासनाच्या मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा.

हा शासन निर्णय, नियोजन विभागाच्या अनौपचारीक संदर्भ क्र. ४७/१४३४, दि. ०३.०६.२०११ अन्वये दिलेल्या सहमतीनुसार तसेच व्यय अग्रक्रम समितीने दि. २१ ऑगस्ट, २०१४ रोजी संपन्न झालेल्या बैठकीत दिलेल्या मंजुरीनुसार व संदर्भ क्रमांक २ नुसार याबाबतच्या निर्गमीत केलेल्या इतिवृत्तानुसार निर्गमीत करण्यात येत आहे.

या योजनेस प्रदान करण्यात आलेली सुधारित प्रशासकिय मान्यता ( ७७/२०१५) अनुक्रमांकावर नोंदण्यात आली आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५०२१२१५५२१९०९२७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Rajendra Baburao Kshirsagar

Digitally signed by Rajendra Baburao Kshirsagar
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Water Resources Department, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Rajendra Baburao Kshirsagar
Date: 2015.02.12 16:01:31 +05'30'

(रा.बा. क्षीरसागर)
शासनाचे अवर सचिव

सहपत्र-परिशिष्ट अ

प्रत,

१. महालेखापाल, महाराष्ट्र राज्य (लेखा व अनुज्ञेयता) मुंबई/नागपूर.
२. महालेखापाल, महाराष्ट्र राज्य (लेखा परिक्षा), मुंबई/नागपूर.
३. वित्त विभाग (व्यय-१२), मंत्रालय, मुंबई ३२
४. नियोजन विभाग (कार्यासन १४३४), मंत्रालय, मुंबई ३२.

५. कार्यकारी संचालक, विदर्भ पाटबंधारे विकास महामंडळ, नागपूर.
६. मुख्य अभियंता, जलसंपदा विभाग, अमरावती.
(सोबत सुधारित प्रशासकीय मान्यतेची परिनिरीक्षण टिप्पणी जोडली आहे)
७. आंतर वित्त सल्लागार व सह सचिव, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई.
८. जिल्हाधिकारी, गोंदिया.
९. अधीक्षक अभियंता, गोंदिया पाटबंधारे प्रकल्प मंडळ, गोंदिया
१०.कार्यकारी अभियंता, गोंदिया लपा प्रकल्प विभाग, गोंदिया
११.अर्थशाखा १/२ (२ प्रती), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई
१२.लपा-१ (२ प्रती), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई
१३.विभागीय संपर्क अधिकारी, माहिती व जनसंपर्क महासंचालनालय, मंत्रालय, मुंबई. (२ प्रती)
१४.लपा-२, संग्रहार्थ.

## परिशिष्ट अ

## शासन निर्णय क्रमांक : प्रकल्प २३१२( २७४/२०१२)/लपा-२, दि. ०५.०२.२०१५

## बेवारटोला लघु पाटबंधारे योजना ता. सालेकसा, जि. गोंदिया

## उपशिर्षनिहाय तरतूदी

| क्र. | उपशिर्ष | रक्कम (लक्ष) |
|---|---|---|
| १ | 'ए' प्रारंभिक कामे | १८.६८ |
| २ | 'बी' भूसंपादन | ५०१.४५ |
| ३ | 'सी' मुख्य कामे | ३१५०.७६ |
| ४ | 'डी' मुख्य विमोचक | १९१.५४ |
| ५ | 'ई' प्रपात | २२.४६ |
| ६ | 'एफ' नाल्यावरील पूल | ७३८.५० |
| ७ | 'जी' रस्त्यावरील पूल | १९८.५७ |
| ८ | 'एच' निर्गमण | १३.५० |
| ९ | 'के' इमारत | ७.२१ |
| १० | 'एल' मातीकाम | ९४८.१२ |
| ११ | 'एम' वनीकरण | ५.९० |
| १२ | 'ओ' किरकोळ कामे | ३.८२ |
| १३ | 'पी' देखभाल व दुरुस्ती | १०.४९ |
| १४ | 'आर' दळणवळण | ५.०० |
| १५ | 'एस' लॉस ॲण्ड स्टॉक | ८.५४ |
| १६ | भाग ३ वितरीका | ५६२.८० |
|  | **एकुण** | **६३८७.३४** |
|  | **आनुषंगिक खर्च** | **५८८.५९** |
|  | **योजनेची एकूण किंमत (रु.लक्ष)** | **६९७५.९३** |

**ठळक बाबी**

अ) या योजनेचे सिंचन क्षेत्र १७४२ हेक्टर आहे.

ब) या योजनेमुळे एकूण होणारा पाणीसाठा २५०४ सघमी. आहे.

क) प्रति सहस्त्र घनमीटर पाणीसाठा किंमत रु. ८७५४२/-

ड) लाभव्यय गुणोत्तर १.१० > १.